**मोटार वाहन विभागातील नवनियुक्त सहायक मोटार वाहन निरीक्षक यांच्या कार्यशाळा प्रशिक्षणासाठी येणा-या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी- ०३२५/प्र.क्र.८१/परि-४,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २८ मार्च, २०२५.

**वाचा:** १. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पआका/का-१३/प्रशिक्षण-१३/ २०२३/जा.क्र. ११४१९, दि.१०.१०.२०२४.

२. महाव्यवस्थापक (यं.अ.), महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.राप/यंअ/कर्मचारी/२४३६, दि.०६.०९.२०२४

**प्रस्तावना :** परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त वाचा येथील दि.१०.१०.२०२४ च्या पत्रान्वये कळविल्यानुसार, मोटार वाहन विभागात सन २०२२-२३ या वर्षात २४० सहायक मोटार वाहन निरीक्षक यांची भरती प्रक्रिया प्रस्तावित होती. सदर भरती प्रक्रिया सुरु झाली असून आजतागायत २२७ नवनियुक्त सहायक मोटार वाहन निरीक्षक यांना नियुक्ती आदेश जारी होऊन सदर सहायक मोटार वाहन निरीक्षक हे महाराष्ट्रातील विविध कार्यालयात रुजू झाले आहेत. सदर २४० नवनियुक्त सहायक मोटार वाहन निरीक्षक यांना दोन वर्षाचे प्रशिक्षण आणि कार्यानुभव महाराष्ट्रातील विविध प्रशिक्षण संस्थामध्ये द्यावयाचे आहे. त्यानुसार सदर नवनियुक्त २२७ सहायक मोटार वाहन निरीक्षक यांना महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांच्या विभागीय कार्यशाळांमध्ये एक वर्षाचे कार्यशाळा प्रशिक्षण देण्यात येणार आहे. त्यापैकी १४ सहायक मोटार वाहन निरीक्षक यांचे दि.१५.०७.२०२४ व दि.०१.०८.२०२४ पासून कार्यशाळा प्रशिक्षण सुरु आहे.

महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाने दि.०६.०९.२०२४ रोजीच्या पत्रानुसार प्रति प्रशिक्षणार्थी प्रति दिन रु.७८+१८ टक्के वस्तु व सेवा कर(रु.९२.०४/-) याप्रमाणे १४ अधिकाऱ्यांसाठी रु.९२.०४ x १४ प्रशिक्षणार्थी x ३६५ दिवस = रु.४,७०,३२४/- इतके शुल्क अदा करणेस कळविले आहे. त्यानुसार मोटार वाहन विभागातील नवनियुक्त १४ सहायक मोटार वाहन निरीक्षकांच्या कार्यशाळा प्रशिक्षणासाठी येणाऱ्या रु.४,७०,३२४/- (रुपये चार लाख सत्तर हजार तीनशे चोवीस फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णय :-** मोटार वाहन विभागातील नवनियुक्त १४ सहायक मोटार वाहन निरीक्षक यांच्या महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ यांच्या विभागीय कार्यशाळामध्ये दि.१५.०७.२०२४ व दि.०१.०८.२०२४ पासून सुरु झालेल्या एक वर्षाच्या कार्यशाळा प्रशिक्षणासाठी येणाऱ्या रु.४,७०,३२४/- (रुपये चार लाख सत्तर हजार तीनशे चोवीस फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी येणारा खर्च " मागणी क्र. बी-३, २०४१ वाहनावरील कर, (०१)(०२) मोटार वाहन विभागातील अधिकारी व कर्मचारी यांना प्रशिक्षण (योजनांतर्गत) (२०४१ ०३४१)-१३ कार्यालयीन खर्च " या लेखाशीर्षाखाली त्या त्या आर्थिक वर्षाकरीता मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला उप विभाग-तीन मधील अनुक्रमांक ४ व महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका मधील परिच्छेद २७(२) अ) नुसार एखाद्या योजनेला / प्रकल्पाला प्रशासकीय (वित्तीय मंजूरी धरुन) मान्यता देण्याबाबत आवर्ती खर्चाच्या बाबतीत वार्षिक रुपये पन्नास लक्ष व अनावर्ती खर्चाच्या बाबतीत रुपये पाच कोटी योजनेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना आहेत. या अधिकारान्वये सदरहू शासन निर्णय निर्गमित करण्यात आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८११०३११२०२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNIL BABURAO APATE

Digitally signed by SUNIL BABURAO APATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=19ff433c24f38ac95f09eaa0a14f560224a1a78a80f8b940775fc013021ca5ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4EA86DEC92091A126823D249DF451DF3C8D235CDD7E9111D7624C78A7C95B318, cn=SUNIL BABURAO APATE
Date: 2025.03.28 11:03:58 +05'30'

**( सु.बा.आपटे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
३. मा.राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
४. महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई/नागपूर.
५. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
७. परिवहन उप आयुक्त (निरीक्षण/प्रशासन/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.उप सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

११.उप/सह सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव (अर्थ-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवडनस्ती- (परि-४).